**एकत्रीत परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-५ व ६ मधील सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी गट ब संवर्गातील परिविक्षाधीन उमेदवारांचे खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एमव्हीडी-०९१९/प्र.क्र.२२५/परि-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १३ मार्च २०२०.

वाचा :

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग टिआरएन२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि. २०.०१.२०१४.
२) शासन पत्र क्र. टिआरएन-०६१८/प्र.क्र.५१/सीपीटीपी-ब, दि. १७.०९.२०१९.
३) शासन परिपत्रक क्रमांक: टिआरएन-२०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दि. २५.०९.२०१९.
४) शासन परिपत्रक क्रमांक:टिआरएन-२०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दि. ३१.१०.२०१९
५) शासन निर्णय,गृह विभाग क्रमांक:एमव्हिडी०९१९/प्र.क्र.२२५/परि-४, दि. २६.११.२०१९.
६) शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः टिआरएन-०६१८/प्र.क्र.५१/सीपीटीपी-ब, दिनांक १७.०१.२०२०
७) शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः टिआरएन-०९१९/प्र.क्र.५७/सीपीटीबी-ब, दिनांक ०५.०३.२०२०

## आदेश

सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी (गट ब) या संवर्गामध्ये राज्यसेवा मुख्य परिक्षा-२०१७ च्या अंतिम निकालाच्या आधारे २ उमेदवारांची व राज्यसेवा मुख्य परिक्षा-२०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारे ४ उमेदवारांची अशा एकूण ६ उमेदवारांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने शिफारस केली आहे. उक्त ६ उमेदवारांकरीता संदर्भ क्र. ५ येथील दि. २६.११.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि. ३०.०९.२०१९ पासुन दोन वर्षाच्या कालावधीसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आली आहेत.

२. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम -५ व ६ अंतर्गत संबंधित ६ परिविक्षाधिन अधिकारी यांचे पायाभूत प्रशिक्षण / अनिवार्य संलग्नता / तांत्रिक प्रशिक्षण / महाराष्ट्र भेट / दिल्ली भेट ही प्रशिक्षणे दिनांक २१.०३.२०२० रोजी समाप्त होत आहेत. उक्त परिविक्षाधीन सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचे खातेनिहाय जिल्हा संलग्न प्रशिक्षण, जिल्हा स्तरीय प्रशिक्षण व स्वतंत्र्य कारभार हे ७३+४ आठवड्यांचे प्रशिक्षण दि. २३.०३.२०२० (म. पु.) पासून सुरु होणार आहे.

३. सदर प्रशिक्षणासाठी संबंधित ६ परिविक्षाधीन सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी यांना खाते निहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणासाठी खालीलप्रमाणे जिल्हे नेमुन देण्यात येत आहेत.

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | उमेदवाराचा स्वजिल्हा | जिल्हा संलग्नता |
|---|---|---|---|
| १. | श्री. पाटील निखिल विजयराव | जळगाव | मुंबई (मध्य) |
| २. | श्री. डोंगरजाळ सुजीत सुदामसिंग | औरंगाबाद | नागपूर (ग्रा) |
| ३. | श्री. नव्हाडे पवन उमाकांत | नांदेड | पुणे |
| ४. | श्री. नलवडे प्रसाद शिवदास | सोलापूर | लातूर |
| ५. | श्री. बंगाळे एकनाथ दत्तात्रय | बुलढाणा | औरंगाबाद |
| ६. | श्री. तातू योगेश नारायण | औरंगाबाद | नाशिक |

४. सदर ७३+४ आठवड्याचे प्रशिक्षणासाठी वरील परिविक्षाधीन अधिका-यांनी दि. १६.०३.२०२० रोजी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र यांचे कार्यालय, ५ वा मजला, एमटीएनएल इमारत, दुरसंचार भवन, फाऊन्टन २, फोर्ट, मुंबई येथे सकाळी १०.०० वाजता उपस्थित रहावे.

५. सदर प्रशिक्षण कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी यांना खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत-

अ) संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी यांनी उक्त प्रशिक्षणाच्या काळात प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिका-यांसाठी सोबत जोडलेल्या **विवरणपत्र "अ"** नुसार समन्वय अधिकारी / प्रशिक्षकाची (सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी/ मोटर वाहन निरीक्षक) व्यवस्था करावी व त्यांनी त्यांचा मुल्यांकन अहवाल परिवहन विभागास सादर करावा.

ब) सदर प्रशिक्षण कालावधीमध्ये प्रशिक्षणार्थीस काही अडचणी / तांत्रिक समस्या उद्भवल्यास त्याचे निराकरण तात्काळ करण्यात यावे.

क) प्रशिक्षण कालावधीत संबंधित प्रादेशिक परिवहन कार्यालयाने परिविक्षाधीन अधिका-यांच्या उपस्थितीची नोंद ठेवावी व त्यांच्या उपस्थितीबाबत परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांना कळविण्यात यावे.

ड) प्रशिक्षण कालावधीत परिविक्षाधीन सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी यांनी दैनंदिन रोजनिशी ठेवावी.

इ) या प्रशिक्षण कालावधीत परिविक्षाधीन सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी यांना सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक दि. १३.११.२०१७ अन्वये विहित केल्यानुसार रजा अनुज्ञेय राहतील.

ई) सदर प्रशिक्षण कालावधीतील उपरोक्त परिविक्षाधीन सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी यांचे वेतन परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांच्या कार्यालयामार्फत अदा करण्यात येईल.

उ) परिविक्षाधीन सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी यांना देण्यात येणा-या ७३+४ आठवड्यांचे प्रशिक्षण कार्यक्रम खालीलप्रमाणे विहित केला आहे:-

**खातेनिहाय जिल्हा संलग्नता (७३+४+१) आठवड्यांचे प्रशिक्षण**

| अ.क्र. | विभाग व ठिकाण | आठवडा | मार्गदर्शक व नियंत्रक अधिकारी |
|---|---|---|---|
| १. | परिवहन आयुक्त, म. रा. यांचे कार्यालय, वांद्रे, मुंबई. | दि. १६.०३.२०२० ते दि.१५.०५.२०२० (एकुण ९ आठवडे) | परिवहन आयुक्त यांनी नियुक्त केलेले अधिकारी |
| २. | लायसन्स विभाग (मोटार वाहन निरीक्षक स्तर) | दि. १८.०५.२०२० ते दि.१०.०७.२०२० (एकुण ८ आठवडे) (संलग्नता ४ आठवडे व स्वतंत्र्य कार्यभार ४ आठवडे) | संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी |
| ३. | लायसन्स विभाग (सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी स्तर) | दि. १३.०७.२०२० ते दि.१८.०९.२०२० (एकुण १० आठवडे) (संलग्नता ५ आठवडे व स्वतंत्र्य कायभार ५ आठवडे) | संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी |
| ४. | नोंदणी विभाग (मोटार वाहन निरीक्षक स्तर) | दि. २१.०९.२०२० ते दि.१३.११.२०२० एकुण ८ आठवडे (संलग्नता ४ आठवडे स्वतंत्र्य कार्यभार ४ आठवडे) | संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी |
| ५. | नोंदणी विभाग (सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी स्तर) | दि. १६.११.२०२० ते दि.१९.०२.२०२१ एकुण १४ आठवडे (संलग्नता ७ आठवडे व स्वतंत्र्य कार्यभार ७ आठवडे) | संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी |
| ६. | अंमलबजावणी विभाग (मोटार वाहन निरीक्षक स्तर) व (सीमा तपासणी नाक्यावरील कामकाज | दि.२२.०२.२०२१ ते दि. २१.०५.२०२१ एकुण १३ आठवडे (संलग्नता ७ आठवडे व स्वतंत्र्य कार्यभार ३ आठवडे) सीमा तपासणी नाका संलग्नता ३ आठवडे | संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी |
| ७. | कार्यालयीन कामकाज (सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी स्तर) | दि. २४.०५.२०२१ ते दि.१३.०८.२०२१ (एकुण १२ आठवडे-संलग्नता.) | संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी |
| ८. | १४.०८.२०२१ ते २९.०८.२०२१ या कालावधीत २ आठवडे पुनर्विलोकन व उजळणी प्रशिक्षणासाठी कार्यमुक्त करण्यात यावे | | |
| ९. | रस्ता सुरक्षाविषयक कामकाज (सहायक | दि. ३०.०८.२०२१ ते दि. २४.०९.२०२१ (एकुण ४ आठवडे) | संबंधित प्रादेशिक परिवहन अधिकारी |

| | | | |
|---|---|---|---|
| | प्रादेशिक परिवहन अधिकारी स्तर) | | |
| संचालक, सीपीटीपी, नागपूर यांच्या दिनांक १३.०३.२०२० रोजीच्या पत्रान्वये कळविण्यात आल्यानुसार संबंधित प्रशिक्षणार्थींना दिनांक १६.०३.२०२० पासून जिल्हासंलग्नता प्रशिक्षणासाठी विभागात रुजु करुन घेण्याच्या सूचना देण्यात येत आहेत. | | | |

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००३१३१८०३४२७५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.03.13 18:06:32 +05'30'

**(द.ह.कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित परिविक्षाधीन सहायक प्रादेशिक परिवहन अधिकारी.

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) प्रादेशिक परिवहन अधिकारी, प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य), नागपूर (ग्रा), पुणे, धुळे, नाशिक.
४) उप सचिव, सीपीटीपी-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) संचालक, वनामती, नागपूर.
६) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
७) निवडनस्ती-४

## विवरणपत्र अ

## खातेनिहाय जिल्हा संलग्नता ७३+४ आठवड्यांचे प्रशिक्षण

**अ) परिवहन आयुक्त कार्यालयातील संलग्नता - कालावधी - ८ आठवडे**

१) राज्याच्या मुख्यालयातील खालील शाखांमधील कार्यप्रणाली व क्षेत्रीय कार्यालयांशी समन्वय

२) धोरण

३) रस्ता सुरक्षा

४) अंमलबजावणी

५) वाहन कर, प्रवास कर, व्यवसाय कर, परवाना,

६) रचना व कार्यपध्दती,

७) निरीक्षण

८) संगणक

**ब) क्षेत्रीय कार्यालयातील संलग्नता**

१) मोटार वाहन निरीक्षक आणि सहाय्यक प्रादेशिक परिवहन आधिकारी या दोन स्तरांवर प्रामुख्याने खालील विभांगाशी संलग्नता देणे प्रस्तावित आहे.

२) अनुज्ञप्ती विभाग

३) नोंदणी विभाग

४) अंमलबजावणी विभाग

५) कर अन्वेषण विभाग

६) प्रशासकीय विभाग

**१)** अनुज्ञप्ती **विभाग**

मोटार वाहन निरीक्षक स्तर :- कालावधी-८ आठवडे
(संलग्नता ०४ आठवडे)
(स्वतंत्र कार्यभार ०४ आठवडे)

शिकाऊ अनुज्ञप्ती चाचणी

पक्के अनुज्ञप्ती चाचणी

सारथी प्रणाली (संगणक) प्रशिक्षण

**१.१)** अनुज्ञप्ती **विभाग**

मोटार वाहन निरीक्षक स्तर (शिकाऊ अनुज्ञप्ती) :-

- शिकाऊ अनुज्ञप्ती विषयक CMVR अंतर्गत तरतुदी प्रक्रीया शुल्क यांची माहिती घेणे.
- शिकाऊ अनुज्ञप्ती मोटार वाहन निरीक्षक / सहा. मोटार वाहन निरीक्षक यांच्या सोबत प्रत्यक्ष काम.
- शिकाऊ अनुज्ञप्ती चाचणीचे प्रत्यक्ष काम.

**१.२)** अनुज्ञप्ती **विभाग**

मोटार वाहन निरीक्षक स्तर (पक्के अनुज्ञप्ती):-

- पक्के अनुज्ञप्ती विषयक CMVR अंतर्गत तरतूदी प्रक्रिया, शुल्क यांची माहिती घेणे.

- पक्के अनुज्ञप्ती बाबत मोटार वाहन निरीक्षक / सहा. मोटार वाहन निरीक्षक यांच्या सोबत प्रत्यक्ष काम.
- पक्के अनुज्ञप्ती चाचणीचे प्रत्यक्ष काम.

१.३) अनुज्ञप्ती **विभाग**

सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी स्तर :-

कालावधी - १० आठवडे
(संलग्नता ५ आठवडे)
(स्वतंत्र कार्यभार ५ आठवडे)

अनुज्ञप्ती प्राधिकारी या भूमिकेतून पुनर्चाचणी व अनुषंगिक कामकाज, आंतरराष्ट्रीय परवाना, तसेच अभिलेख जतन

१.४) अनुज्ञप्ती **विभाग**

सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी स्तर :-

- पक्क्या अनुज्ञप्तीच्या इच्छुक उमेदवारांची पुनर्चाचणी, अनुज्ञप्ती जारी करण्याच्या प्रक्रियेचा अभ्यास.
- अनुज्ञप्ती नूतनीकरणाबाबत कार्यपध्दतीचा अभ्यास.
- अनुज्ञप्तीच्या दुस-या प्रतीबाबत कार्यपध्दतीचा अभ्यास.
- कार्यालयातील अनुज्ञप्ती अभिलेख जतन करणे, अभिलेख अद्ययावत करणे.
- आंतरराष्ट्रीय परवाना तरतूदी प्रक्रिया, शुल्क यांची माहिती घेणे.
- सारथी प्रणाली (संगणक) प्रशिक्षण

**२) नोंदणी विभाग**

मोटार वाहन निरीक्षक स्तर :-

(कालावधी ८ आठवडे)
(संलग्नता ४ आठवडे)
(स्वतंत्र कार्यभार ४ आठवडे)

- नवीन वाहनांची नोंदणी.
- योग्यता प्रमाणपत्र नूतणीकरणाकरिता वाहन निरीक्षण.
- वाहन प्रणाली (संगणक) बाबतचे प्रशिक्षण

**२.१) नोंदणी विभाग**

मोटार वाहन निरीक्षक स्तर :-

- नवीन वाहनांची नोंदणी CMVR अंतर्गत तरतूदी प्रक्रिया, शुल्कबाबत अभ्यास.
- परिवहन वाहनांच्या नोंदणीबाबत विशिष्ट घटकांची माहिती घेणे. (उदा. मोठी मालवाहू वाहने, बसेस, अखिल भारतीय पर्यटक परवान्यावरील बसेस, स्कुल बसेस इ.)
- आयातीत वाहनांच्या नोंदणीबाबत तरतूदी प्रक्रिया, शुल्क याबाबत अभ्यास.

**२.२) नोंदणी विभाग**

मोटार वाहन निरीक्षक स्तर :-

- परिवहन वाहनांच्या योग्यता प्रमाणपत्र नूतनीकरणाकरिता वाहन निरीक्षण.
- खाजगी वाहनांची पुनर्नोंदणी.
- इतर राज्यातून आणलेल्या वाहनांचे निरीक्षण.
- वाहनातील केलेल्या बदलांबाबत वाहनांचे निरीक्षण आणि अभिलेख अद्ययावत करणेबाबत.

**२.३) नोंदणी विभाग**

सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी स्तर :-

कालावधी १४ आठवडे
(संलग्नता ७ आठवडे)
(स्वतंत्र कार्यभार ७ आठवडे)

नोंदणी प्राधिकारी या भूमिकेतून परिवहन व खाजगी वाहनांच्या बाबतीत नवीन वाहन नोंदणी, वाहन हस्तांतरण व अनुषंगिक बाबी, अभिलेख जतन

**२.४) नोंदणी विभाग**

सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी स्तर :-

- खाजगी संवर्गातील नवीन वाहनांची नोंदणी.
- परिवहन संवर्गातील नवीन वाहनांची नोंदणी.
- इतर राज्यातून आणलेल्या वाहनांचे निरीक्षण.
- वाहनातील केलेल्या बदलांबाबत नोंदणी व वाहन कर या दोन्ही दृष्टीकोनातून अनुषंगिक कार्यवाही.
- वाहनांचे हस्तांतरण
- वाहन मालक मयत झाले असल्यास हस्तांतरण कार्यवाही.
- बिनधनी वाहनांची पुनर्नोंदणी व अनुषंगिक हस्तांतरण कार्यवाही.
- वाहनावरील कर्जाचा बोजा चढविणे व उतरविणेबाबत कार्यवाही.

वरील सर्व बाबींमध्ये कर्मचारीस्तरावरील प्रक्रिया समजून घेणे, या प्रक्रिया स्वत: करणे

- वाहन प्रणाली (संगणक) बाबतचे प्रशिक्षण

**३) अंमलबजावणी विभाग**

मोटार वाहन निरीक्षक स्तर :-

कालावधी - १३ आठवडे
(संलग्नता ७ आठवडे)
स्वतंत्र कार्यभार ३ आठवडे
व सीमा तपासणी नाका
संलग्नता-३ आठवडे)

- अंमलबजावणी पथक
- वाहन ना-वापर तपासणी
- अपघातग्रस्त वाहन निरीक्षण
- तालुकास्तरावरील शिबिर दौरे
- सीमा तपासणी नाका येथे कामकाज

**३.१) अंमलबजावणी विभाग**

मोटार वाहन निरीक्षक स्तर :-

- अंमलबजावणी पथकासोबत जावून वाहन तपासणी, दोषी वाहनांवर गुन्हा दाखल करणे.
- वाहनांचा अटकाव करणे.
- जागेवर दंडवसुली करणे.
- वाहन तपासणीची नोंदवही अद्ययावत करणे.
- वाहन तपाणीची कामगिरी अभिलेख्यातून तपासणे.

**३.२) वाहनांचा ना-वापर**

कार्यालयीन प्रक्रियेचा अभ्यास.

ना-वापर वाहनांची प्रत्यक्ष तपासणी.

ना-वापर वाहने आढळल्यास अनुषंगिक कार्यवाही.

ना-वापर वाहन न-आढळल्यास अनुषंगिक कार्यवाही.

**३.३) अपघातग्रस्त वाहन निरीक्षण**

संपूर्ण कार्यपध्दती समजून घेणे.

अपघातग्रस्त वाहनांचे प्रत्यक्ष निरीक्षण करणे.

अपघातग्रस्त वाहनांच्या निरीक्षणाचा अहवाल तयार करणे.

**३.४) तालुकास्तरावरील शिबिर / दौरे**

शुल्क व कर संकलन प्रक्रियेची संपूर्ण कार्यवाही समजून घेणे.

लायसन्स विषयक नोंदणी विषयक आणि योग्यता प्रमाणपत्र नूतनीकरण विषयक नोंदी घेणे, प्रत्यक्ष कार्यवाही करणे.

**३.५) सीमा तपासणी नाक्यावरील कामकाज :-**

* शुल्क व कर संकलन प्रक्रियेची संपूर्ण कार्यवाही समजून घेणे.
* परिवहन वाहनांची कागदपत्र विषयक आणि यांत्रिक स्थितीविषयक तपासणी कार्यपध्दती.
* दोषी वाहनांवर गुन्हा दाखल करणे.
* वाहनांचा अटकाव करणे.
* जागेवर दंड वसुली करणे.

*ओव्हर लोड आढळलेल्या वाहनांबाबत संपूर्ण कार्यवाही.

**४) कार्यालयीन कामकाज :-**

सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी स्तर (संलग्नता कालावधी - १२ आठवडे)

माहिती अधिकारी अधिनियम, आस्थापना विषयक बाबी, लेखा विषयक बाबी, रचना व कार्यपध्दती नियमावली, जनसंपर्क विषयक बाबी, लेखा परीक्षण, रोख विभाग, कर निर्धारण व कर थकबाकी वसुली विषयक प्रक्रिया, वाहन लिलाव प्रक्रिया, सर्व सांविधिक (Statutory) समित्या कामकाज विषयक माहिती, अभियोग शाखा, न्यायालयीन प्रक्रिया, प्रशासकीय कामकाज, इत्यादी.

**५) रस्ता सुरक्षाविषयक कामकाज:-**

सहाय्यक प्रादेशिक परिवहन अधिकारी स्तर -- कालावधी ०४ आठवडे

सर्वोच्च न्यायालयाच्या रस्ता सुरक्षा समितीचे निर्देशानुसार परिवहन आयुक्त कार्यालयाने जारी केलेली परिपत्रके, त्यांची अंमलबजावणी, ब्लॅक स्पॉटची व्याख्या, ब्लॅक स्पॉट निर्धारण संदर्भात केलेली व चालू असलेली कार्यवाही, ब्लॅक स्पॉटवर करावयाच्या अल्प व दीर्घ मुदतीच्या उपाययोजना, जिल्हा पातळीवर रस्ता सुरक्षा पंधरवडामध्ये हाती घ्यावयाच्या विविध कार्यक्रमांचे नियोजन, सन २०२०-२१ या वर्षात कार्यक्रमनिहाय खर्चासाठी रस्ता सुरक्षा या विषयासाठी प्राप्त निधीचा विनियोग या विषयांबाबत माहिती अवगत करावी.

***************